**अनुसूचित जाती उपयोजना अंतर्गत अनुसूचित जाती / नवबौध्द शेतकऱ्यांना शेतीसाठी अर्थसहाय्य देण्याची योजना सन २०११-१२ अंतर्गत उत्पन्नाची मर्यादा रू.२५०००/- पासून रू. ५००००/- पर्यंत वाढविणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- विघयो - १६११/ प्र.क्र.११२/४अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक - १२ ऑक्टोंबर, २०११**

**संदर्भ :-१) शासन निर्णय क्रमांक :- विघयो १६११/ प्र.क्र.११२/४अे, दि. ३ जून, २०११**
**२) शासन निर्णय क्रमांक :- विघयो १६११/ प्र.क्र.११२/४अे, दि. २३ ऑगस्ट, २०११**
**३) वित्त विभागाची दि. ३० ऑगस्ट, २०११ ची टिप्पणी**

**प्रस्तावना :-**

दारिद्रय रेषेखाली असणा-या अनुसूचित जाती /नवबौध्द शेतक-यांचे उत्पन्न वाढवून त्यांना दारिद्रय रेषेच्यावर आणण्यासाठी अर्थसहाय्य देण्याची योजना कृषि विभागामार्फत विशेष घटक योजनेतर्गत सन १९८२ पासून राज्यामध्ये राबविण्यात येत आहे. या योजनेंतर्गत जमीन सुधारणा, निविष्ठा पुरवठा, पीक संरक्षण औजारे /शेतीची सुधारीत औजारे, बैलगाडी, बैलजोडी / रेडेजोडी, इनवेल बोअरिंग, जुनी विहीर दुरुस्ती, पाईपलाईन, पंपसेट, ताडपत्री, नवीन विहीर इत्यादी बाबींवर अनुसूचित जाती /नवबौध्द शेतक-यांना अनुदान देण्यात येते. सदर योजना सन २०११-१२ मध्ये चालू ठेवण्यासाठी रू. ९५५३.३३ लाखाच्या ( रु. पंच्याण्णव कोटी त्रेपन्न लाख तेहतीस हजार फक्त ) निधीस व
रू. ५००.०० लाखाच्या ( रू. पाच कोटी फक्त )निधीस शासनाची, संदर्भाधीन दि. ३ जून, २०११ च्या शासन निर्णयान्वये अनुक्रमे प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच रू. ६६६४.९९ लाखाच्या ( रू. सहासष्ट कोटी चौसष्ट लाख नव्याण्णव हजार फक्त ) निधीस दि. २३ ऑगस्ट, २०११ च्या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात आली आहे.

२. सदर योजनेचा लाभ घेण्यासाठी दारिद्रय रेषेखालील शेतकऱ्यांसाठी वार्षिक उत्पन्नाच्या मर्यादेची अट राहणार नाही. मात्र दारिद्रय रेषेखालील शेतकऱ्यांशिवाय अन्य अनुसूचित जाती व नवबौध्द शेतकऱ्यांच्या बाबतीत ज्या शेतकऱ्यांची जमीन धारणा ६ हेक्टर किंवा त्यापेक्षा कमी आहे आणि ज्यांचे सर्वमार्गांनी मिळणारे वार्षिक उत्पन्न रु.२५,०००/- पर्यंत आहे. अशा शेतकऱ्यांना तहसिलदार यांचेकडून उत्पन्नाचा दाखला देणे बंधनकारक होते. तथापि, सद्य:स्थितीतील रू. २५,०००/- ची उत्पन्नाची मर्यादा अतिशय कमी असून, गरजू लाभार्थी शेतकऱ्यांना अशा प्रकारे उत्पन्नाचा दाखला मिळण्याची शक्यता खूपच कमी आहे. परिणामी योजनेंतर्गत लाभार्थी मिळणे दुरापास्त झाले आहे, ही बाब विचारात घेऊन उत्पन्न मर्यादा रू. ५००००/- पर्यंत वाढविण्याची मागणी अनेक लोकप्रतिनिधी व पदाधिकारी यांच्याकडून होत असल्यामुळे, त्यानुषंगाने वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. वित्त विभागाच्या मान्यतेनुषंगाने सदर योजनेचा लाभ घेण्यासाठी दारिद्रय रेषेखालील शेतकऱ्यांशिवाय अन्य अनुसूचित जाती व नवबौध्द शेतकऱ्यांच्या बाबतीत ज्या शेतकऱ्यांची जमीन धारणा ६ हेक्टर किंवा त्यापेक्षा कमी आहे आणि ज्यांच्या सर्वमार्गांनी मिळणाऱ्या वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रु. २५,०००/- होती, त्याऐवजी वाढवून रू. ५०,०००/-पर्यंत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दारिद्रय रेषेखाली असणा-या अनुसूचित जाती /नवबौध्द शेतक-यांचे उत्पन्न वाढवून त्यांना दारिद्रय रेषेच्यावर आणण्यासाठी अर्थसहाय्य देण्याची योजना कृषि विभागामार्फत विशेष घटक योजनेतर्गत सन १९८२ पासून राज्यामध्ये राबविण्यात येत आहे. सदर योजनेचा लाभ घेण्यासाठी दारिद्रय रेषेखालील शेतकऱ्यांसाठी वार्षिक उत्पन्नाच्या मर्यादेची अट राहणार नाही. सदर योजनेचा लाभ घेण्यासाठी दारिद्रय रेषेखालील शेतकऱ्यांशिवाय अन्य अनुसूचित जाती व नवबौध्द शेतकऱ्यांच्या बाबतीत ज्या शेतकऱ्यांची जमीन धारणा ६ हेक्टर किंवा त्यापेक्षा कमी

आहे आणि ज्यांच्या सर्वमार्गांनी मिळणाऱ्या वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रु.२५,०००/- होती त्याऐवजी वाढवून रू. ५०,०००/-पर्यंत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. योजनची अमंलबजावणी व कार्यपध्दती संदर्भाधीन दि. **३ जून, २०११ व २३ ऑगस्ट, २०११ च्या** शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व कार्यपध्दती प्रमाणेच राहिल.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ १८०/११ / व्यय- १, दि. ३० ऑगस्ट, २०११ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

४ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळ www.maharashtra.gov.in वर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१११०२०१०५२१२००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

**( वि. मा. बिवलकर )**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन,**

**प्रति**

आयुक्त कृषि,महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व विभागीय आयुक्त
संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय,पुणे (१० प्रतीसह)
संचालक,समाज कल्याण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व संचालक/सहसंचालक,कृषि आयुक्तालय,पुणे
सर्व विभागीय कृषि सह संचालक
जिल्हाधिकारी व सदस्य सचिव,जिल्हा नियोजन समिती (सर्व)
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
सर्व अति मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
व्यवस्थापकिय संचालक,महाबीज अकोला
सर्व कृषि विकास अधिकारी,जिल्हा परिषद
विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी,सर्व जिल्हे
जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद सर्व
महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर
महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०००२०
अधिदान व लेखा अधिकारी मुंबई
सामाजिक न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२, (कार्यासन विघयो १ )
सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी,(कृषि) कृषि व पदुम विभाग
ग्रामविकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
सहसंचालक (विघयो) कार्यालय संचालक,समाज कल्याण,संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे - १
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभाग व्यय-१ / अर्थसंकल्प - १३ ,मंत्रालय,मुंबई
नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव / निवड नस्ती